**मौजे कुवारबांव, ता. जि. रत्नागिरी येथे २ महाराष्ट्र नेवल युनिट साठी एनसीसी भवन बांधकामाकरीता निधी वितरणास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राछासे २०२३/प्र.क.२३०/क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०६ मार्च, २०२५

**वाचा :-** १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग: राछासे-२०२३/प्र.क.२३०/क्रीयुसे-३, दि. ०७ मार्च, २०२४
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. आस्थाप/राछासे-रभबांधकाम/२०२४-२५ /का-५/३५४, दि. १७ मे, २०२४
४) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. आस्थाप/राछासे-रभबांधकाम/२०२४-२५ /का-५/११७१, दि. २६ जुलै, २०२४

**प्रस्तावना :**

मौजे. कुवारबांव, ता. जि. रत्नागिरी येथे २ महाराष्ट्र नेवल युनिट या कार्यालयाकरीता एन.सी. सी. भवन बांधकामासाठी सन २०२२-२३ च्या दरसुचीप्रमाणे रू. ४२,४३,६१,०१०/- ( अक्षरी रूपये चार हजार दोनशे त्रेचाळीस लक्ष, एकसष्ठ हजार दहा फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. (१) च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी संदर्भाधीन पत्रान्वये उक्त बांधकामासाठी निधीची मागणी केली आहे. त्यानुसार सद्यस्थितीत मौजे. कुवारबांव, ता. जि. रत्नागिरी येथे २ महाराष्ट्र नेवल युनिट या कार्यालयाकरीता एन.सी. सी. भवन बांधकामासाठी रु. ५,००,००,०००/- ( अक्षरी रूपये पाच कोटी फक्त ) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मौजे. कुवारबांव, ता. जि. रत्नागिरी येथे २ महाराष्ट्र नेवल युनिट या कार्यालयाकरीता एन.सी. सी. भवन बांधकामासाठी रु. ५,००,००,०००/- ( अक्षरी रूपये पाच कोटी फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील खर्च ०१ सर्वसाधारण शिक्षण-२०२ माध्यमिक शिक्षण (०४) शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) ५३ मोठी बांधकामे ( ४२०२ ६२२८ )" या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीत तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय संदर्भाधीन शासन निर्णय, वित्त विभाग मधील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. यासाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीसंदर्भात गटप्रमुख, गटमुख्यालय, राष्ट्रीय छात्र सेना, कोल्हापूर यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अ.नौ.सं. क्र. ११४/१४७१, दिनांक १०.०२.२०२५ व वित्त विभागाच्या अ.नौ.सं. क्र. २४८/व्यय-५, दिनांक २०.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३०६१८४५३३४१२१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA KETAN TONDE

Digitally signed by KAVITA KETAN TONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education Department, 2.5.4.20=d9d6cb2ca7858ab2922f2f069c1dcf0c59dbd6f04e8ac435f94b342b3c624ecc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a738d4711deb1f586dd1811780ba863704a1ea496ff9ec7d1b6a62b204ab4751, cn=KAVITA KETAN TONDE
Date: 2025.03.06 18:46:52 +05'30'

**( कविता तोंडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मुंबई
२. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई
४. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक,
५. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. महालेखापाल ( लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
१०. महालेखापाल ( लेखा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
११. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर (संचालनालयामार्फत)
१२. वित्त विभाग (व्यय-५)/नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. समादेशक अधिकारी, २ महाराष्ट्र नेवल युनिट, राष्ट्रीय छात्र सेना, रत्नागिरी
१६. निवड नस्ती (क्रीयुसे- १ व २ )